सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत-
जय भवानी महिला शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
शासन निर्णय, शाभाभा-१११९/प्र.क्र.४७/टेक्स-१ (ब)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०२५.

वाचा :-

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दि.११.८.१९९३
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-११९७/प्र. क्र.१९३/ टेक्स-१, दि. २४.३.१९९९.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-११०५/प्र. क्र.३८/ टेक्स-१(अ), दि. १५.६.२००६.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-३३१६/प्र. क्र.८१/ टेक्स-१(अ), दि. १०.७.२०१७.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-३३१७/प्र. क्र.९०/ टेक्स-१(ब), दि. २.११.२०१८.
६. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्रकल्प-१२१८/प्र. क्र.७६/ टेक्स-१(ब), दि. ४.७.२०१९.
७. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. शाभाभा-१११९/प्र.क्र.४७/टेक्स-१(ब), दि. २७.८.२०१९
८. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्रकल्प-१२१८/प्र.क्र.७६/टेक्स-१(ब), दि. ०४.०१.२०23
९. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३, दि. २५.०७.२०२४
१०.आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांचे पत्र क्र. कार्या ६(१)/सूतगि/जय भवानी एरंडेश्वर/शा.भा./६६६७/२०२४, दि. १४.८.२०२४.

प्रस्तावना :-

सहकारी सूतगिरण्यांनी शासनाकडे सादर केलेल्या प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्यासाठी कर्जे व भागभांडवलाचे प्रमाण १:१ ठेवून सभासद भागभांडवलाच्या १:९ प्रमाणात शासकीय भागभांडवल देण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने जमा सभासद भागभांडवलाच्या प्रमाणात जय भवानी महिला शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी या सूतगिरणीस

सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात शासकीय भागभांडवल मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

जय भवानी महिला शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी या सूतगिरणीची संदर्भ क्र. ५ येथील दि.०२.११.२०१८ च्या शासन निर्णयान्वये शासन अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.६ येथील दि.०४.०७.२०१९ च्या शासन निर्णयान्वये ५:४५:५० या आकृतीबंधानुसार या सूतगिरणीच्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीस मंजूरी देण्यात आली असून येथील दि.०४.०१.२०२३ च्या शासन निर्णयान्वये सूतगिरणीच्या रु.८००७.२४ लाख इतक्या सुधारित प्रकल्प अहवालास मंजूरी देण्यात आली आहे. सदर सूतगिरणीने रु. ४००.३६ इतके सभासद भागभांडवल जमा केले आहे. प्रकल्पाच्या आकृतीबंधानुसार १:९ या प्रमाणात सदर गिरणीस पहिल्या टप्प्यासाठी रु. १८०१.६३ लाख इतके शासकीय भागभांडवल अनुज्ञेय ठरते. शासन निर्णय दि.२७ ऑगस्ट २०१९ अन्वये या सूतगिरणीस रु.६५०.०० लाख शासकीय भागभांडवल अदा करण्यात आलेले आहे.

२. खुल्या प्रवर्गातील सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्यासाठी "मागणी क्रमांक - व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च - (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना - (००) (०५) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने " या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२०२५ या वर्षासाठी मंजूर रु.६०.०० कोटीची तरतूद सुधारीत अंदाजामध्ये आता रु. ४२.०० कोटी एवढी झालेली आहे. सदर निधीतून जय भवानी महिला शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी या सूतगिरणीस रु. ११५१.६३ लाख (अक्षरी रुपये अकरा कोटी एक्कावन्न लाख त्रेसष्ठ हजार फक्त) इतकी रक्कम शासकीय भागभांडवल म्हणून गिरणीचा प्रकल्प उभारण्यासाठी तसेच प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबींवर होणारा जास्तीचा खर्च गिरणी स्वभागभांडवलातून करील या अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासकीय भागभांडवल शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८३/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि. २४.३.१९९९ मध्ये नमूद केलेल्या (अ.क्र.५ वगळून) अटी व शर्ती, तसेच शासकीय भागभांडवलासंदर्भात शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) प्रस्तुत सूतगिरणीकडून, शासन निर्णय, स.,प. व व. विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र. क्र. १८३/ टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व दिनांक २४.३.१९९९ मधील (अ.क्र.५ वगळून) अटी व शर्तींचे पालन होत आहे याबाबत आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी खात्री करावी.

२) शासकीय भागभांडवलाच्या वसुलीबाबतच्या दि. २४.३.१९९९ मधील अ.क्र.५ येथील

अटी- मध्ये शा. नि., क्र. सूतगि-३३१६/ प्र.क्र.८१/ टेक्स-१अ, दि. १०.७.२०१७ अन्वये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे - **सूतगिरणीने भागभांडवलाचा पहिला हप्ता स्विकारल्यानंतर ५ वर्षांनी किंवा सूतगिरणी सुरु झाल्यानंतर ३ वर्षांनी यापैकी जे आधी घडेल तेव्हापासून उचल केलेल्या भागभांडवलाची परतफेड १/१५ प्रमाणे सुरु करण्यात येईल आणि असे न केल्यास त्यावर दरसाल दर शेकडा १२% प्रमाणे व्याज आकारण्यात येईल.** सदर अटीच्या अनुषंगाने प्रस्तुत सूतगिरणीकडून, परतफेडीस पात्र ठरलेल्या शासकीय भागभांडवलाची काटेकोरपणे वसुली करण्याच्या सूचना आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांना देण्यात येत आहेत. तसेच परतफेडीस पात्र ठरलेल्या शासकीय भागभांडवलाच्या वसुलीचा वार्षिक हप्ता भरणा केल्याशिवाय प्रस्तुत सूतगिरणीस कोणताही व्यवहार करता येणार नाही. याबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवून तशा सूचना संबंधित बँकेस द्याव्यात.

३) सदर सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल आयुक्त वस्त्रोद्योग यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

४) प्रस्तुत गिरणीसंदर्भात शासन निर्णयामधील तरतुदीनुसार वसुलीबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी .

५) आयुक्त वस्त्रोद्योग यांनी पुढील ३ महिन्यांत सदर सूतगिरणीच्या विद्यमान संचालक मंडळाकडून, प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत होणा-या रु. ११५१.६३ लाख (अक्षरी रुपये अकरा कोटी एक्कावन्न लाख त्रेसष्ठ हजार फक्त) इतक्या रकमेच्या १०% इतक्या वैयक्तिक मत्तेचे तारण मिळवावे. जोपर्यंत असे वैयक्तिक तारण प्राप्त होणार नाही, तोपर्यंत प्रस्तुत वितरीत रक्कम गिरणीस खर्च करता येणार नाही. तसेच तोपर्यंत या आदेशाद्वारे मंजूर केलेल्या रकमेवर सूतगिरणीस अधिकर्ष (overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही असे बंधन आयुक्त वस्त्रोद्योग यांनी संबंधित बँकेवर घालावे. याबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी काटेकोरपणे व तातडीने कार्यवाही करावी.

६) या आदेशानंतर प्रस्तुत सूतगिरणीच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास, नवनियुक्त संचालक मंडळास तातडीने शासकीय भागभांडवलाच्या १०% इतके वैयक्तिक मालमत्तेचे तारण द्यावे लागेल. नवनियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतरच ते संचालक मंडळ अस्तित्वात येईल आणि पूर्वीच्या संचालक मंडळाने काही गैरव्यवहार केला नसल्यास त्यांचे वैयक्तिक तारण मुक्त करण्यात येईल अशी सुधारणा संस्थेच्या Bye- Laws मध्ये करण्याची कार्यवाही आयुक्त वस्त्रोद्योग यांनी करावी.

७) सूतगिरणीच्या प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाच्या Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही. त्यामुळे त्याबाबतची खात्री आयुक्त वस्त्रोद्योग यांनी करुन घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

८) प्रस्तुत सूतगिरणीकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करीत असल्याची खात्री आयुक्त वस्त्रोद्योग यांनी करावी.

९) प्रस्तुत सूतगिरणीने शासकीय भागभांडवलाच्या प्रमाणात कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा. याबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

१०) प्रकल्प अहवालात नमूद केल्यानुसार त्या त्या बाबींवर त्या त्या प्रमाणातच गिरणीने खर्च करावा. मंजूर प्रकल्प अहवालापेक्षा जादा होणारा खर्च गिरणीने स्वभागभांडवलातून करावा या अटीवर सदरचे शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे. याबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

११) सदर सहकारी सूतगिरण्यांच्या खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे अदा करावी तसेच निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये. याबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

१२) गिरणीस प्राप्त झालेल्या भागभांडवलाचा तसेच गिरणीकडे शिल्लक असलेल्या रकमेचा गिरणी योग्य प्रकारे विनियोग करते किंवा नाही याबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

१३) सूतगिरणीने भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. याबाबत आयुक्त वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१४) प्रस्तुत गिरणीने खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा करावे. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१५) खरेदी विषयक प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

१६) सूतगिरणीची उभारणी विहित कालमर्यादेत पूर्ण करावी.

१७) गिरणीने प्रकल्प पूर्ण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात, शासन निर्णय, क्रमांक सूतगि-१२००/ ११७१३/ प्र.क्र.४२६/ टेक्स-१(अ), दि. १५.६.२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

१८) सूतगिरणीने मंजूर प्रकल्प अहवालाच्या आकृतीबंधानुसार ५% सभासद भागभांडवल उभारणे बंधनकारक असून सदर सभासद भागभांडवलाची रक्कम सूतगिरणीच्या प्रयोजनाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी खर्च करता येणार नाही. तसेच शासनाकडून सूतगिरणीला मंजूर करण्यात येणाऱ्या ४५% शासकीय भागभांडवलाच्या रक्कमेचा विनियोग करताना सूतगिरणीने ५०% रक्कम वित्तीय संस्थेकडून कर्ज म्हणून मंजूर करुन घेणे आवश्यक आहे. शासकीय भागभांडवलापोटी प्राप्त रक्कमेचा विनियोग करताना वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाचाही विनियोग त्याच प्रमाणात करणे गिरणीवर बंधनकारक राहील.

१९) सदर सूतगिरणीच्या सर्व सभासदांनी त्यांचे आधार कार्ड नंबर लिंक करणे बंधनकारक राहील.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवलाची रक्कम रु. ११५१.६३ लाख (अक्षरी रुपये अकरा कोटी एक्कावन्न लाख त्रेसष्ठ हजार फक्त) जय भवानी महिला शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी (JAIBHAVANI MAHILA SHETKARI SAHAKARI SOOTGIRNI MARYADIT, ERANDESHWAR, TAL. PURNA, DIST. PARBHANI) या सूतगिरणीच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, परभणी शाखा, खाते क्र.३७७७६०६२६१९ मध्ये RTGS द्वारे जमा करण्यात यावी.

५. सदर सूतगिरणीस मिळालेले अर्थसहाय्य हे गिरणीचा प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे संस्थेवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एकरकमी वसूल करण्यात येईल. तसेच अशा प्रकरणी संबंधित संचालक मंडळास व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

६. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ अन्वये, “३२-अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ४,५, १५ मधील तरतुदी सदर प्रकरणी लागू असून वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ च्या शासन निर्णयातील तपासणी सूचीतील अ.क्र.९ मध्ये नमूद केलेल्या अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. २ मधील तरतुदी विचारात घेता योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नाही.

७. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ) नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं- २०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ८.७.२०१९ अन्वये “३२ अंशदाने” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

२) मंजूर निधी:- "मागणी क्रमांक - व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च - (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना - (००) (०५) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या वर्षासाठी मंजूर रु.६०.०० कोटीची तरतूद सुधारीत अंदाजामध्ये आता रु. ४२.०० कोटी एवढी झालेली आहे. आतापर्यंत या लेखाशीर्षाखाली कोणतीही रक्कम खर्च झाली नाही.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- जय भवानी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., ता. पूर्णा, जि. परभणी या सुतगिरणीस शासन

निर्णय दि. २७ ऑगस्ट २०१९ अन्वये रु.६५०.०० लाख  शासकीय भागभांडवल अदा करण्यात आलेले असुन सदर निधी खर्च झालेला आहे.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:- सदर लेखाशीर्षाखाली एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे:- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे:- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा:- सूतगिरणीच्या स्थापत्य बांधकामाच्या निविदांना मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीची मान्यता घेऊनच सूतगिरणीने बांधकाम करणे बंधनकारक आहे.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत:- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

९) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- खरेदी विषयक प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी:- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

८. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु. ११५१.६३ लाख (अक्षरी रुपये अकरा कोटी एक्कावन्न लाख त्रेसष्ठ हजार फक्त) इतकी शासकीय भागभांडवलाची रक्कम "मागणी क्रमांक - व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च - (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना - (००) (०५) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी व सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावी.

९. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु. ११५१.६३ लाख (अक्षरी रुपये अकरा कोटी एक्कावन्न लाख त्रेसष्ठ हजार फक्त) इतकी रक्कम जय भवानी महिला शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी (JAIBHAVANI MAHILA SHETKARI SAHAKARI SOOTGIRNI MARYADIT, ERANDESHWAR, TAL. PURNA, DIST. PARBHANI) या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन प्रस्तुत

सूतगिरणीच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, परभणी शाखा खाते क्र. ३७७७६०६२६१९ मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री.श्रीकृष्ण पवार, उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यानुसार त्यांनी सदर सहकारी सूतगिरणीस उपरोक्त शासकीय भागभांडवलाची रक्कम RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी. बँकेचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| बँकेचे नाव व शाखा | चालू खाते क्रमांक | एम.आय.सी.आर. क्रमांक | आय.एफ.एस.सी. क्रमांक |
|---|---|---|---|
| State Bank of India<br>Parbhani Branch<br>Post Bag no.-07,Plot no. 55, Shivaji Road,<br>Parbhani- 431401 | 37776062619 | 431002957 | SBIN0003667 |

१०. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६३/२०२५/व्यय २ दि.१८.०३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेच्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११९४२२७१४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

CHITRA RAVINDRA BISEN

Digitally signed by CHITRA RAVINDRA BISEN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f789a84db3cd4420e2db86c40df943d84a7873bde6b5343 0a5e3b150b091368e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0BD6EA041CD6F49090B004C64DAAE9708BF029C7 6F9B139C454C2A8EA66C7EA3, cn=CHITRA RAVINDRA BISEN
Date: 2025.03.31 19:43:49 +05'30'

**( चित्रा बिसेन )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

- महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
- महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
- सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
- कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (२ प्रतींसह), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

- अवर सचिव, १७-स/कार्यासन अधिकारी, १६-स, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
- वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
- प्रादेशिक उपआयुक्त (वस्त्रोद्योग), छत्रपती संभाजी नगर.
- जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, परभणी.
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
- अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
- ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
- शाखा व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया, परभणी शाखा, पोस्ट बॅग नं.०७, प्लॉट नं.५५, शिवाजी रोड, परभणी -४३१४०१.
- व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई.
- चेअरमन, जय भवानी महिला शेतकरी सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, तालुका पूर्णा, जिल्हा परभणी
- निवडनस्ती (टेक्स १- ब )